**टंचाई कर्मचाऱ्यांना शासन सेवेत पर्यायी नेमणुका देण्याची योजना बंद करण्याबाबत.**

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय क्रमांक : एईएम-११९६/प्र.क्र.१९/२००१/१६-अ,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १६ ऑगस्ट,२००२.

संदर्भ : १) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : एईएम-१०७३/२४९१/जे-२, दि. ७/१/१९७४.
२) शासन पत्र, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : एईएम-१०८९/९४६/प्र.क्र.७/९०/१६-अ, दि. २/१२/१९९१.
३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : एईएम-१०९५/प्र.क्र.७/९५/१६-अ, दि. २/५/१९९५.

## शासन निर्णय

**प्रस्तावना :-**

सन १९७२ मध्ये राज्यात अवर्षणामुळे भीषण टंचाई निर्माण झाली होती. या टंचाई निर्मूलन कामावर ज्या कर्मचाऱ्यांच्या नियुक्त्या करण्यात आल्या होत्या,त्या नियुक्त्या टंचाई परिस्थितीत सुधारणा झाल्यामुळे समाप्त झाल्या. अशा कर्मचाऱ्यांना पर्यायी नेमणूका मिळाव्यात म्हणून संदर्भाधीन क्र.१ च्या आदेशानुसार एक योजना विहित करण्यात आली होती. या योजनेनुसार सेवा समाप्त करण्यात आलेल्या कर्मचाऱ्यांच्या याद्या जिल्हाधिकारी यांच्या कार्यालयात ठेवून सबंधित विभाग/कार्यालयांच्या मागणीनुसार टंचाई कर्मचाऱ्यांची कार्यव्ययी आस्थापनेवरील नेमणुकीसाठी संबंधित जिल्हाधिकाऱ्यांनी शिफारस करावयाची होती. त्यानुसार संबंधित जिल्हयातील सार्वजनिक बांधकाम विभाग, पाटबंधारे विभाग, वन विभाग, पाणीपुरवठा विभाग, इत्यादी विभागांनी त्यांच्या कार्यव्ययी आस्थापनेवर या कर्मचाऱ्यांना सामावून घ्यावयाचे होते. याकरिता या योजनेस वारंवार मुदतवाढ देण्यात आली होती. औरंगाबाद, नागपूर, नांदेड व यवतमाळ या जिल्हयातील प्रतिक्षायादीवर असलेल्या टंचाई कर्मचाऱ्यांना कार्यव्ययी आस्थापनेवर नियुक्ती न मिळाल्यामुळे अशा कर्मचाऱ्यांना संबंधित जिल्हयातील सार्वजनिक बांधकाम विभाग, पाटबंधारे विभाग, वन विभाग, पाणीपुरवठा विभाग, इत्यादी विभागातील कार्यव्ययी आस्थापनेवर आवश्यकतेनुसार नियुक्ती मिळण्यासाठी संदर्भाधीन क्र.३ च्या आदेशानुसार सदर योजना दि.३१.१२.१९९५ पर्यंत चालू ठेवण्यात आली होती. परंतु या कालावधीतही संबंधित विभागांच्या आस्थापनेवर पुरेशा प्रमाणात पदे उपलब्ध नसल्यामुळे व कार्यव्ययी आस्थापनेवर पदे निर्माण करण्यास निर्बंध असल्यामुळे प्रतिक्षायादीवरील कर्मचाऱ्यांपैकी काही कर्मचाऱ्यांनाच नियुक्त्या मिळू शकल्या.तसेच आता वित्त विभागाने त्यांच्या दि.१०.९.२००१ च्या आदेशान्वये रोजंदारी व कार्यव्ययी आस्थापनेवरील कर्मचाऱ्याच्या नियुक्त्यांवर व कार्यव्ययी आस्थापनेवर शासन मान्यतेनेसुध्दा पदे निर्माण करण्यावर निर्बंध घातले आहेत. तसेच बहुतांश पदे निवड मंडळाच्या कक्षेत असल्यामुळे व या पूर्वी कार्यव्ययी आस्थापनेवर काही कर्मचाऱ्यांना नियुक्त्या देण्यात आल्यामुळे आता उर्वरित टंचाई कर्मचाऱ्यांना नियमित आस्थापनेवर नियुक्त्या दिल्यास कार्यव्ययी आस्थापनेवर नियुक्त्या दिलेल्या कर्मचाऱ्यांवर अन्याय होईल व असे करणेही उचित होणार नाही. आजमितीस या कर्मचाऱ्यांचे वय किमान ४८ पासून

कमाल ६० झाले असल्याचे जिल्हाधिकाऱ्यांनी शासनाच्या निदर्शनास आणले आहे. यासर्व कारणांमुळे टंचाई कर्मचाऱ्यांना यापुढे शासन सेवेत नियुक्ती मिळण्यास वाव नाही, हे विचारात घेऊन शासन पुढीलप्रमाणे आदेश देत आहे.

**निर्णय :-**

सन १९७२ मध्ये अवर्षणामुळे निर्माण झालेल्या टंचाईच्या परिस्थितीवर उपाययोजना करण्यासाठी विविध विभागामार्फत सुरु करण्यात आलेल्या टंचाई निर्मूलन कामावर तात्पुरत्या स्वरुपात नियुक्त करण्यात आलेल्या व त्यानंतर सेवासमाप्त करण्यात आलेल्या टंचाई कर्मचाऱ्यांना शासकीय सेवेत कार्यव्ययी आस्थापनेवर पर्यायी नियुक्त्या देण्याच्या संदर्भाधीन क्र.१ च्या आदेशामधील योजनेचा पुर्नविचार करून तसेच वित्त विभागाने कार्यव्ययी आस्थापनेवर पदे निर्माण करण्यावर निर्बंध घातले असल्यामुळे, नियमित आस्थापनेवर नियुक्त्या देणे शक्य नसल्याने व या टंचाई कर्मचाऱ्यांचे वय किमान ४८ ते कमाल ६० असल्यामुळे त्यांना शासकीय सेवेत नियुक्त्या देणे शक्य नाही.त्यामुळे या टंचाई कर्मचाऱ्यांना शासन सेवेत पर्यायी नेमणूका देण्याची योजना या आदेशान्वये रद्द करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे.

हे आदेश वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांच्या अनौपचारीक संदर्भ क्र.१७९/वि.सु., दि.२६/२/२००२ अन्वये निर्गमित करण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( द.दा.देशपांडे )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

राज्यपाल यांचे सचिव,
मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
उपमुख्यमंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री,राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मुख्य सचिव,
शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
*प्रबंधक,उच्च न्यायालय,मूळ न्याय शाखा,मुंबई,
*प्रबंधक,उच्च न्यायालय,अपील शाखा,मुंबई,
*प्रबंधक,महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण,मुंबई,
*सचिव,महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय,विधानभवन,मुंबई,
सर्व विभागीय आयुक्त / सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हापरिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
सर्व मुख्याधिकारी, नगर परिषदा/नगरपालिका,
संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय,मंत्रालय,मुंबई
सर्व मंत्रालयीन विभाग,
मंत्रालयीन विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख / कार्यालय प्रमुख,
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने
निवड नस्ती.

* पत्राने.

hadkar/hadkar letter56